

# एक रिकामी फ्रेम

पल्लवी अक्षरा

ई साहित्य प्रतिष्ठान

ई-साहित्य प्रतिष्ठान
वर्ष तिसरे, अंक – १५ वा,
११ एप्रिल २०११

मुखपृष्ठ

आनंद माने
( Last Bench Designs )

**अतिथी संपादक**

नितीन थोरवे(पुणे)

**संपादक**

शशिकांत रणवरे (ठाणे)

**सह संपादक**

सोनाली घाटपांडे (पुणे)

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)

सारंग भणगे ( पुणे )



## अतिथी संपादकाचे मनोगत

नमस्कार वाचक मित्रहो ,

मी नितिन थोरवे, जन्म उस्मानाबादमधील गौर या खेडेगावातला. वयाच्या दुसऱ्या वर्षी साताऱ्यातील फलटणला काकांकडे रवानगी झाली.व्यवसायाने म्हणाल तर होमिओपॅथिक फिजिशियन पण गेली साडे तीन वर्ष औषध निर्माणशास्त्र संशोधन क्षेत्रात कार्यरत. कॉलेज व प्रॅक्टीस निमित्त ८ वर्ष साताऱ्यात काढली. मग नोकरी निमित्त २ वर्ष मुंबई आणि गेले १ वर्ष पुण्यात आहे.

अगदी लहानपणापासुन वाचनाची आवड मग कधी पाचवीत असताना रामायण वाचण्यासाठी ३-४ किलोमीटर चालुन मित्राच्या घरी जाण, कधी शाळेतल्या पहिल्या तासापासुन क्रमिक पुस्तकात ठेऊन अरेबियन नाईट्स वाचणं, तर कधी लायब्ररीत खोट बोलुन दोनदा पुस्तक बदलणं, उन्हाळा, दिवाळीच्या सुट्टीत भागवतांच्या अनुवादीत पुस्तकापासुन पु.ल.देशपांडेंच्या बटाट्याच्या चाळीचा फडशा पाडणं हे ओघान आलच. साधारणतः आठवीत असताना लेखनाचा पहीला प्रयत्न केला असावा,
पण त्यात खरी कविता किती आणि ओढुनताणुन जुळवलेली यमंक किती हा आजही प्रश्न आहे. मग मराठी, हिंदी दोन्ही भाषेत कविता केल्या. नववीत असताना काकांना कवितांची वही सापडली अन 'एक अकेला' नावाची कविता वाचुन त्यांनी तुला एकट का वाटतय, तुझ लग्न करायच आहे का? अस काहीतरी विचारल आणि माझ लिखाण तिथेच बंद झाल.

कॉलेजला आल्यानंतर मग जिवलग मित्र मैत्रीणींना पत्र लिहिण्यापासुन पुन्हा सुरुवात झाली त्यातली बरीचशी प्रेमपत्रच, असंख्य प्रेमपत्र (तीच माझी प्रेयसी आज माझी बायको आहे). पण जगण्याच्या शर्यतीत हे लिहीण हरवुन गेलं. साधी डायरी लिहीण जमेनास झाल. मनात कुठेतरी नेहमी वाटायच की स्वतःला व्यक्त करायला हवं पण संधी मिळत नव्हती, अशातच शशिकांतचा संदर्भ मिळाला आणि नेटाक्षरी साठी मी लिहु शकतो अस त्याने सांगितल. मी आज येथे काही लिहु शकतो त्याच पुर्ण श्रेय माझी पत्नी विद्या आणि शशिकांत यांना आहे. आणि मला संधी दिल्याबद्दल नेटाक्षरीच्या पुर्ण टिमचे मनः पुर्वक आभार.

समस्त नेटाक्षरीकरांना नव वर्षाच्या हार्दिक शुभेच्छा!!!!!!!!!!!!!!!!!!!!!!!!!!!

# रिकामी चौकट

कधी नव्हे ते पहाटे पाचला जाग आली. रात्री  उशिरा झोपल्यानंतर अशी जाग येण अशक्यच. सवयीप्रमाणे बाजुला पाहील तर अंथरुणावर ना बायको दिसली ना मुलगा. मग लख्खकन प्रकाश पडला आणि बायको माहेरी गेल्याच आठवल. काय कराव काही सुचेना आणि निद्रादेवी काही केल्या प्रसन्न होईना. एवढ्या सकाळी टिव्ही किंवा लॅपटॉप चालु करावासा वाटेना, मग गॅलरीत जावुन उभा राहीलो.

कधी न मिळणारा रिकामा वेळ मिळाल्यावर सर्वसामान्य माणसाच जे होत तेच माझ झालं, डोक्यात विचारचक्र सुरु झाल, ३-४ वर्षातील सर्व घटनांचा पट डोळ्यासमोर तरळु लागला, ३ वर्षापुर्वी स्वतःची सोडलेली प्रॅक्टीस, स्वीकारलेला जॉब, सर्व ऑफीसमेट्स , कॉर्पोरेट क्षेत्रातील राजकारण, त्यात टिकून रहाण्यासाठीची माझ्यासारख्या सर्वसामान्य माणसाची धडपड, रोजचा मुंबईचा घामेजलेला प्रवास, अरेंज केलेला प्रेमविवाह, पडलेल्या संसारिक जबाबदाऱ्या, बायकोच्या रास्त मागण्या, रोजच्या रुटीनमधून तिला देत न येणारा वेळ, तिची प्रेग्नेन्सी, पुण्यात झालेली बदली, ऑफीसतर्फे झालेली परदेशवारी . . . . सर्व काही आठवल. . . . . केलेले कष्ट आणि स्वतःच्या अचिवमेंट्स आठवुन ऊर अभिमानाने भरुन आल,धन्य धन्य झालो.

एव्हाना पुर्व दिशा उजळु लागली होती. क्षितीजावर सुर्याची कोवळी किरण दिसु लागली होती, अन मनात काहितरी बोचल, जाणवल की खरच किती चौकटबद्ध आयुष्य जगतो आहोत आपण. रोज तिच चौकट भरत, तेच रुटीन आयुष्य जगत, तोच प्रवास, तेच काम चालु आहे, सार काही प्रमाणबद्ध, आखलेल, समाज्याच्या चौकटीत बसणार. मीही एक पांढरपेशी आणि दिवसांचे रकाने भरणारा सर्व सामान्य माणुस झाल्याच दुःख मनाशी चरचरल.

कुठेतरी आत खोलवर काहीतरी खद्खद्ल, भुतकाळाची खपली निघाली अन वाहु लागल्या सळसळत्या आठवणी . . . . . .विसरलेल्या . . . .किंबहुना मनातल्या कुठल्यातरी कोपऱ्यात खोलवर दडलेल्या, मग आठवला तो सर्व बंधन झुगारुन स्वतःची चौकट रिकामी ठेवणारा मी. . . . . .स्वछंदी कॉलेज लाइफ, मित्रांबरोबर स्वैर हिंडणे, बाइकवरच्या कोकण गोवा ट्रिप्स, गर्लफ्रेंड बरोबर अनुभवलेला कास ठोसेघरचा पाऊस, तिथल्या झाडापानाफुलांशी जडलेल्या आठवणी, युनिवर्सिटी एक्झामस चालु असताना पाहिलेले सिनेमे, रात्रीबेरात्री आईसक्रिम खायला बाइक बाहेर काढण, पाहिलेले वेगवेगळे रुग्ण आणि चौकटी बाहेर जाऊन सर्वतोपरी मदत. . . . . . . सार काही डोळ्यातुन वाहु लागल . . . . . .

गॅलरीखालच्या रस्त्यावरील वर्दळ आता वाढु लागली होती, नि मग घरात आलो डोळ्यातल पाणी लपवत. . . . . . .स्वतः पासुनच

रोज जगताना आपणच आपल्यासाठी एक चौकट आखत असतो, समाजाच्या नियमावलीत स्वतःला बांधुन टाकतो, मग सुरु होत चौकटीतल चाकोरीब्द्ध आयुष्य. जसजशी दिवसांची पाने सरत जातात, वर्ष उलटत जातात तसतशी ही चौकट भरण्यातच आपण अडकुन पडतो आणि पाहत राहतो स्वप्न ती चौकट मोडायची, रिकामी करायची. . . . . . उद्यापासुन रोज सकाळी जॉगिंगला सुरुवात करूया, उद्यापासुन गाण्याच्या क्लासला जाणारच असे संकल्प रोज रात्री आपण मनाशी करत असतो, पण सकाळी साडेसहाचा अलार्म सगळ काही विसरायला लावतो आणि चौकटीतला दिवस सुरु होतो, स्वतःच्या भविष्यासाठी, मुलांच्या शिक्षणासाठी, सर्व भौतिक गरजांच्या पुर्तीसाठी ही चौकटच आधार असते. पण कोणत्याही चौकटीस न जुमानणाऱ्या मनाच काय? सर्व सामान्य देहातल्या असामान्य स्वतःसाठी, सात्विक आनंदासाठी, जगण्याच्या समाधानासाठी, नवीन काही अनुभवण्यासाठी ही चौकट रिकामी ठेवण गरजेच नाही का??

# संपादकीय

## एक रिकामी फ्रेम

फ्रेम म्हटल की डोळ्यासमोर चटकन एक आयताकृती, जुनाट झालेली आणि वर्षानोवर्ष कोण्या एका व्यक्तीचा भार न थकता संभाळणारी वस्तु डोळ्यासमोर उभी रहाते. ब-याचदा आपल्या परिचयाची फ्रेम म्हणजे आपल्या घरातील एका कोपऱ्यात निवांत विसावलेल्या देवबाप्पाची फ्रेम किवा त्याच देवबाप्पाच्या घरी गेलेल्या आपल्या आप्तेष्टाची हार घातलेली न आवडणारी फ्रेम.तर कधी आपल्याला हव्याहव्याशा वाटणाऱ्या प्रिय व्यक्तीची फ्रेम . पण आपला आणि अशा चौकटींचा संबध इथेच संपत नाही घरातील याच चौकटींपुढे नतमस्तक होऊन जेव्हा आपण बाहेर पडतो तेव्हा हा अनाहुत प्रवास आपल्याला आयुष्याच्या अशा कितीतरी चौकटींमधुन घडवुन तयार करत असतो पुढे अशाच एखाद्या फ्रेम मध्ये जाऊन बसायला. अशा अनेक चौकटींना ॲडजस्टमेंट अस नाव देऊन आपण कळत नकळत स्वतःच्या किवा समाजाच्या कर्तेनाकर्तेपणाच एक भाग होऊन जातो. अनेक बुरसट चालिरीतींच आपण समर्थन करु लागतो. आणि असा समाज सुधारु पहाणाऱ्या महात्म्यांना आपण याच चौकटीत नेऊन बसवतो.

इथे फ्रेम या शब्दाचा अर्थ थोड्या व्यापक पदधतीने घेण्याचा आपण प्रयत्न करणार आहोत. इथे अपेक्षित असलेली फ्रेम ही नुसतीच परिचयाची रिकामी चौकट नसुन त्या चौकटीत बसलेल्या, बसु पहाणाऱ्या आणि लोप पावत चाललेल्या आपल्या सामाजीक , सांस्कृतिक मनोवृत्तीच प्रतिबिंब दर्शवणारी आहे. अशाच अर्थहीन झालेल्या, होऊ पहाणाऱ्या फ्रेम मधील मला सतत बोचत असलेली फ्रेम म्हणजे आपल्या राष्ट्रपित्याची फ्रेम. अनेक सरकारी कार्यालया दुर्लक्षीत आणि असहाय अशी हि फ्रेम मला नेहमीच रिकामी वाटते नव्हे ती आणखी कशी रिकामी करत येईल याची खबरदारी दुर्देवाने आपण सगळेच घेत आहोत.

म्हणुनच चला तर मग बघुया हेच रिकामपण या कागदाच्या चौकटीत कोणी कसं मांडलय ते.



# अडगळ

एक जुनाट चौकट
अडगळीत पडलेली
त्या कृष हातांना जड झालेली
थरथरते हात, थरथरलेले क्षण
आणि
डोळ्यात तरळलेले
थरथरलेले अश्रु

कितीतरी वेळा त्याने ती चौकट
पुन्हा  पुन्हा पुसली
उगाच पुन्हा शोधल
हरवलेल बालपण
हरवलेले आईबाप
हरवलेल तारुण्य
हरवलेल प्रेम आणि
हरवलेली ओळखसद्धा

नुसतीच एक चौकट अर्थहीन
अस्तित्व हरवलेली
नुसत्या आठवणींनी जड झालेली
फुलांचा ही भार आता सहन होणार नाही अशी
म्हणुनच आज त्याने ती चौकट
पुन्हा अडगळीत टाकली नाही
कवटाळली घट्ट उराशी

त्यालाही बहुतेक उमगल असाव
त्याचा हि असाच संपत आलेला प्रवास
अडगळीतला
एका चौकटीतुन दुसऱ्या चौकटीत

**शशिकांत  रणवरे (ठाणे)**



# एक रिकामी फ्रेम

स्वच्छ चौकोन
काल परवाच्या भांडणात
भितीवरचा फोटो निखळुन
जमिनीवर खळाळला

आता तिथे फोटो नाही
उरलाय फक्त
स्वच्छ चौकोन
जो आठवण करुन देतो

आपल्या क्षुल्लक भांडणाची
.
.
.
आणि तु नसण्याची

**प्राजक्त देशमुख**



# फ्रेम

माझ्या दिवास्वप्नातले घर
घरचा भला मोठा दिवाणखाना
दिवाणखान्याच्या भिंतीवर
लावली आहे एक आकर्षक पण   रिकामी फ्रेम
या फ्रेम मधे काय लावू बरं?
लावावा का फोटो स्वतंत्र भारतासाठी
शहीद झालेल्या
एखाद्या नरविराचा?
का लावावा आजच्या सत्ताधिशाचा?
पण नकोच !
लावावा तेथे फोटो  स्वतंत्र भारतात
आत्महत्या कराव्या लागलेल्या
एका कर्जबाजारी बळीराजाचा?
पण त्याने काय होणार?
त्यापेक्षा ही फ्रेम रिकामीच ठेवावी
कधीतरी त्यात लावता येईल फोटो
स्त्री-भ्रुणहत्येत सामील एखाद्या पांढरपेशा
नराधमाचा!   अथवा
माणुसकीला काळीमा फासुन
अगतिक माणसाच्या
अवयवांची तस्करी करणाऱ्या
क्रुरकर्म्यांचा
या फ्रेम मधे रंग भरीन म्हणतो
गद्दार देशद्रोहींच्या रक्ताचा
पण मी एक सामान्य नागरिक
प्रत्यक्षात फार तर फोटो लाविन तेथे
त्या निर्मिकाचा    आणि करेन पुजा मनोभावे
देवा सर्वांना चांगली बुध्दी दे
मला मात्र सुखात ठेव!!!!

**प्रल्हाद दुधाळ**



# अस्तित्व

कालपर्यंत अस्तित्वाचे खाकरणे
घराचा कानाकोपरा भारुन टाकणारे
आज अचानक अस्तित्वहीन झाले
अंगणातील गुरं ढोरं
उगाचच गोठ्यात येरझाऱ्या मारीत होते

आज कुणीच चारा खाल्ला नव्हता
सारे कसे शांत शांत भकास वाटत होते
पोटात खोल खड्डा पडला आणी उर भरुन
आला काळीज चिरत गेले

गेलेले अस्तित्व सावलीच्या रुपात हातातच
येणार नाही हे कळल्यावर
एवढ्यात एक मधुर सुगंध वाऱ्याच्या
झुळुकेबरोबर नाकात शिरला

बैठकीतल्या फोटोला निशिगंधाचा हार
घातलेला होता

ती फुलेच सांगु लागली
हा अंश आता
देवात विलीन झालाय
आता निव्वळ भिंतीवर हलणारी फ्रेम
आणी त्या मागच्या दिवाळीस
काढलेला प्रसन्न मुद्रेत हसणारा चेहरा

**कल्पी जोशी**



# एक रिकामी फ्रेम

नारळाची वाळलेली झावळं
झोपडीच्या त्या तीन भिंती!
त्यावर एक छप्पर
वेताच्या काड्यानी विणलेलं!
दार नाहीच
एक रिकामी फ्रेम ती झोपडी

उन्हाचे कवडसे भिंतीतुन
छपरातुनही डोकावतात!
जमीनिवर रोज नवनविन रांगोळी रेखतात
विलक्षण नक्षीदार गालिच्याने सजलेली
रिकामी फ्रेम आता नक्षीने मढलेली

मुसळधार पाऊस
झोपडीत तळं साचलय
टप टप थेंब पडतच आहेत
पाण्यात तरंग निर्माण होतात
रिकाम्या फ्रेम मधे कैद झालेत

त्याची पिलावळ
त्यात त्याची मोठी पोर
मोठीच होत चालली आहेत
झोपडीच्या भोकांतुन चंद्र पाहतो
घुबडही तीला पहात असतोच



दिवस रिकामाच
त्या रिकाम्या फ्रेम सारखा
रात्री चंद्र तर दिवसा सुर्य
रात्रीच घुबड, दिवसा लांडगा
निरखत असतात लाळ गाळत

आकाशीचे चंद्र - सुर्य
खाली येणार नाहीत
लांडग्याला कशाची पर्वा नाही
झोपडीला दार नाही
रिकामी फ्रेम शहारलेली

रिकामी फ्रेम जुनाट झाली
नारळाची झावळं सडुन गेली
छप्पर पार ऊसवुन गेलय
तिथे आता फक्त ऊरलय
झोपडीचे अवशेष एक रिकामी फ्रेम

**रजनी अरणकल्ले**



# झरोका

गंजलेली लोखंडी गज अन
बुरसट लाकडी चैकट असलेली
एक खिडकी उदास निर्जीव
पण त्या खिडकीच्या बाहेर मात्र
अख्ख जग कस जिवंत जिवंत

कधी कधी संध्याकाळी एकांतात सहजचा
त्या झरोक्यातून
बाहेरच जीवन न्याळत बसतो
आणि हळुच त्यात हरपुन जातो

घरट्यात परतणारा पाखरांचा थवा
पश्चिमेकडुन वाहणारी थंडगार हवा
रंगांची उधळण करणारी रम्य संध्याकाळ
तांबुस, केशरी रंगानी रंगलेल आभाळ

पण आज
पण आज मात्र दुष्टी जरा अलीकडे पडली
अन अचानक एक विचार
मनाला हुरहुर लावुन गेला

खरी सोबत, खरी जवळीक नक्की
कोणाची ??
रंग उधळणाऱ्या सांजेची ???
की
गंज चढलेल्या गजांची ???

**नीरज आडे**



# रिकामी फ्रेम

भिंतीवर लटकतेय एक रिकामी फ्रेम

बाकी सर्वत्र क्षेमच क्षेम

कालच वाचन झाले मृत्युपत्राचे

सगळयांना हवे ते ठेवुन गेले होते

एकमेकाकडे पहात होते सर्व वारस

कुणालाही  नव्हता कमी सुधारस

एवढ्यात कुणीतरी हळुच वदले

काय हो क्यान्सरनेच न वारले

काय गरज होती देणगी देण्याची

ती पण पुर्ण एक कोटीची

गरीब क्यान्सर ग्रस्तांना मदतीसाठी

आणि देहदान काय वेडेपण

शेवटचा फोटो सुध्दा नाही काढता आला

फ्रेम तरी करता आला असता

**राम म्हात्रे**



# भिंतीवरला फोटो

थकल्या देहाला देत आधार कठीचा
लटपटत्या पायांनी तुझा कानोसा घेतला
शोधीत असाच मग घरभर तुला
भितीवरल्या फोटोने सगळा खुलासा केला

नजर समोर होतीच

तुझी फ्रेम लटकलेली
किलकिल्या डोळयांनी
मी ती रोज पाहीलेली
जवळ जाता अधिक
काचेवर त्या माझ्यात तू
अगदी सहज मिसळलेली

थरथरत्या हातांनी मग मी स्पर्शिता तुला
हळुच तु लाजल्याचा तेव्हा भास झाला
शोधीत असाच मग घरभर तुला
भिंतीवरल्या फोटोने सगळा खुलासा केला

माझ्या आवडीचा फोटो हा
त्या जुन्या अल्बम मधला
बघताना तू तेव्हा
एक शब्द टाकलेला
“जाईन मी जेव्हा
या जगातून कायमची
अशीच राहुन समोर
तुला पहायचेय मला”



भरल्या डोळ्यांनी मग मी पाहता तुला
उमाळ्याचा तुझ्या तेव्हा भास मला झाला
शोधीत असाच मग घरभर तुला
भिंतीवरल्या फोटोने सगळा खुलासा केला

बाहेरचा वारा
नंतर घरात शिरलेला
शिरताना फ्रेमवरला
चंदनाचा हार हललेला
तु आल्याची जणू
तेव्हा चाहुल झाली
अन चंदनालाही
तुझा गंध खास आला

दंगल्या मनानी मग मी आठविता तुला
तु असल्याचा तेव्हा भास मला झाला
शोधीत असाच मग घरभर तुला
भितीवरल्या फोटोने सगळा खुलासा केला

**रुपेश सावंत**



# निरागस

एक निरागस वेडा
निरागसच तो
कधी काय करील काय नाही
उमगणार नाहीच ते कुणा

त्याची नेहमीची एक जागा
जिथे तो तासंतास बसायचा
हवेतल्या कॅनवास वर
नुसताच काही रंगवायचा

लोक म्हणे तो वेडा आहे
एक रिकमी चौकट घेऊन
तो नुसताच फिरायचा
लोकांसमोर धरायचा
म्हणायचा बघा यात
यात तुम्हाला दिसेल एक
नवे जग नवे स्वप्न

लोक हसायचे फिदफिदायचे
अन बावळट म्हणुन निघायचे
हा तरीही त्याचा खेळ
रोज करत बसायचा

कधी कुणाकडे त्याने केली
रंगाची मागणी
त्यांनी हि दिले त्याला
मागेल ते रंग



आता त्याचा कॅनवास
रंगु लागला आहे
हवेतले सारे सारे चित्र
दिसु लागले आहे

लोक हि आता जमु लागले
त्याच्या त्या चित्रा भोवती
त्याच्यातल्या त्या बावळट
चित्रकारा भोवती

नुसतेच सात रंग त्याने
उभे आडवे पाडले
कॅनवास नुसता रंगीत रंगीत
अन त्यात कुंचल्याला दडवले

लोक विचारी हे काय
ह्यात अस आहे तरी काय?
तो म्हणाला हि अजुन
रिकामी फ्रेम आहे
तुम्ही पहाल ते दिसेल

कधी नुसतेच रंग
कधी इंद्रधनुष्य
कधी कुंचला
कधी पांढरा रंग
कधी तुम्हाला दिसेल
तुमची स्वप्न
अन नवे विश्व



लोक अचाट पडली
राहून राहून पाहु लागली त्या चित्रात
काय बरे आहे असे खास त्यात
पाहु ते दिसतय कि

खरेच छान

चित्रकाराने चित्र फक्त
सात रंगात रंगवले होते
लोकच ती
दाखवु ते पाहतात नेहमी

रिकमी फ्रेम ती हीच असते

**सुजित शिंदे**

मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे . दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाण होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरी लवकरच शतक गाठेल. ने टाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८0000 हू न अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करून त्यांनाही या आनंदयात्रेत सहभागी करून घ्यावे ही विनंती. असे करताना netaksharee@gmail.com या आमच्या आयडीचा अंतर्भाव कराल ? मग नंतरचे अंक आम्ही त्यांना पाठवत राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

विनोदी मासिक : ई-स्टाप,

ऑडियो ई नियतकालीक अल्बमः स्वरनेटाक्षरी

मुलांसाठी : बालनेटाक्षरी

प्रसिध्द झालेली ई-पुस्तके

- टल्लीची शाळा
- मकरंदच्या त्रिवेण्या
- ग्रेव्हयार्ड लिटरेचर
- चार क्षण
- तो आणि ती
- प्रियेचे अभंग
- देशी दारुचे दुकान-३ D
- ई-शाळा
- तो, मी आणि सिगरेट
- मोरया
- लोकल गोष्टी
- मीरा अनुवाद
- ओथंब
- सावळ्या मुलीची गाणी
- सईची वही
- अहं ब्रह्मास्मी

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच

सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**esahity@gmail.com**

नेटाक्षरीचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व

सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**netaksharee@gmail.com**

आता ई-साहित्यची आजवरची सर्व ई-प्रकाशने उपलब्ध

आहेत सी डी मध्ये फक्त ५0/- रुपयांत १११ ई-पुस्तके

**www.esahity.com**